**राज्यातील अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांसाठी घरकुल योजनेचा Personal Ledger Account मध्ये जमा करण्यात आलेला निधी वितरीत करणेबाबत......**

महाराष्ट्र शासन
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
शासन निर्णय क्र.बीसीएच -२००९/प्र.क्र.१५९/मावक-२
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०००३२.
दिनांक : ३१ ऑगस्ट, २०१०

**वाचा:-**
१) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बीसीएच-२००८/प्र.क्र.३६/मावक-२, दि.१५.११.२००८
२) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बीसीएच-२००९/प्र.क्र.१५९/मावक-२, दि.९.३.२०१०
३) शासन पत्र क्र.बीसीएच-२००९/प्र.क्र.१५९/मावक-२, दि.७.५..२०१०
४) संचालक, समाजकल्याण संचालनालय, पुणे याचे पत्र सकसं/मावक/सहकार/घरकुल/तरतुद/२०१०-११/का १२ ६३५, दि. १२ जुलै, २०१०
५) शासन पुरकपत्र सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र.बीसीएच-२००९/प्र.क्र.१५९/मावक-२, दि. ६.८.२०१०

**प्रस्तावना -**

राज्यातील अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांसाठी घरकुल योजना संदर्भाधिन क्रमांक १ अन्वये राज्यात लागु करण्यात आली आहे. सदर योजनेची अंमलबजावणी संदर्भाधिन क्रमांक २ अन्वये विहित करण्यात आली आहे. ही योजना राबविण्यासाठी सन २००८-०९ व सन २००९-१० या आर्थिक वर्षातील उपलब्ध तरतूदीतून एकुण रु.८००.८१ कोटीचा (रुपये आठशे कोटी ऐक्याऐंशी लाख फक्त ) स्वीय प्रपंजी लेखा **(Personal Ledger Account)** खाते संचालक, समाजकल्याण संचालनालय, पुणे यांच्या नावे उघडण्यात आले आहे. सदर तरतुद विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी यांना दिलेल्या उद्दिष्टांच्या प्रमाणात त्यांना वितरीत करण्यास परवानगी देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**शासन निर्णय -**

संचालक, समाजकल्याण संचालनालय, पुणे यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने त्यांच्या स्वीय प्रपंजी लेखा **(Personal Ledger Account)** खात्यामध्ये आता उपलब्ध असलेल्या रु.८००.८१ कोटी (रुपये आठशे कोटी ऐक्याऐंशी लाख फक्त ) रकमेपैकी तासगांव नगरपरिषद, जिल्हा सांगली उपलब्ध करुन दिलेली रु.१.२१ कोटी रक्कम वजा जाता उर्वरित रु.७९९.६१ कोटी

(रुपये सातशे नव्यान्नव कोटी एकसष्ठ लाख फक्त ) इतकी रक्कम सर्व विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी यांना ठरवून दिलेल्या उद्दिष्टाप्रमाणे खालीलप्रमाणे वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | तपशील | ग्रामीण | शहरी | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | नगरपालिका | महानगरपालिका | एम.एम.आर.डी.ए. |
| १ | संचालक, समाजकल्याण यांचे स्वीय प्रपंची लेख्यामधील उपलब्ध निधी | रु.४८१.४१ कोटी | रु.३१८.२९ कोटी | | |
| २ | सन २०१०-११ करीता दिलेल्या उद्दिष्टांप्रमाणे लाभार्थी संख्या | ६८,५०० | १५,००० | ५,००० | ५,००० |
| ३ | प्रति लाभार्थी अनुदान | रु.७०,०००/- लाभार्थी हिस्सा नाही | लाभार्थ्यांचा १० टक्के हिस्सा वजा जाता रु.१,३५,०००/- | लाभार्थ्यांचा २० टक्के हिस्सा वजा जाता रु.१,८०,०००/- | लाभार्थ्यांचा २० टक्के हिस्सा वजा जाता रु.१,८०,०००/- |
| ४ | उद्दिष्ट पूर्ती करीता आवश्यक रक्कम | रु.४७९.५० कोटी | रु.२०२.५० कोटी | रु.९०.०० कोटी | रु.९०.०० कोटी |
| ५ | उपलब्ध निधीतून प्रत्यक्षात वितरीत करावयाची रक्कम | रु.४७९.५० कोटी | रु.२०२.५० कोटी | रु.९०.०० कोटी | रु.२५.०० कोटी |
| | **शिल्लक रक्कम** | **रु.१.९० कोटी** | **रु.०.७९ कोटी** | | |

**२.** हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेब साईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक क्रमांक २०१००८३११९३९५१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सही/-
**(उ. शि. लोणारे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,
मा.राज्यपाल यांचे सचिव

मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा.उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा.मंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव
अप्पर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग यांचे स्वीय सहाय्यक
प्रधान सचिव (ग्रामविकास), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक
प्रधान सचिव, गृहनिर्माण विभाग यांचे स्वीय सहाय्यक
वित्त विभाग (व्यय-१४/अर्थोपाय,) मंत्रालय, मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र - १/२, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य,पुणे
संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी.
सर्व विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
निवड नस्ती-मावक-२.